# हरवलेला सील

## खरीखुरी घडलेली कथा






लेखक: फ्रँक हॉजकिंग
चित्रे: डॉन पीटरसन
मराठी अनुवाद: तृप्ती कर्णिक



वादळ शांत झालं होतं. पण समृद्राच्या लाटा अजूनही मेनेच्या किनाऱ्यावर धडकत होत्या. छोटसं सील माश्याचं पिल्लू त्या लाटांमधून स्वत:ची सुटका करून घेण्यासाठी धडपडत होतं. किनाऱ्यावर आलेल्या लाटा परत जाताना त्याला आत ओढत होत्या. ते हरवलेलं पिल्लू खूप तान्हं अगदी काही दिवसांचं होतं. वादळामुळे त्याची आईपासून ताटातूट झाली होती आणि लाटांबरोबर ते गटांगळ्या खात खात इकडे पोचलं होतं. पिल्लू सील खूपच छोटं असल्याने त्याला एकट्याने जगण्याची धडपड करणं शक्य नव्हतं. माणसाच्या बाळासारखीच त्यालाही अजून आईच्या दुधाची गरज होती. शत्रूपासून कसा बचाव करायचा, मासे कसे पकडायचे हे शिकवण्यासाठीही त्याला आई लागणार होती.

एकदाचा शेवटचा प्रयत्न करून पिल्लु कसाबसं पाण्यातून बाहेर पडलं. किनाऱ्याला आल्यावर त्याने थांबून आजूबाजूला पाहिलं. दुपारचा आळसावलेला सूर्य तसा क्वचित बरसतो. मोठ्या काळ्याभोर डोळ्यात अडकलेल्या वाळूसकट तो डोळे उघडझाप करत होता.

“ओहहहह-रुSSSS!” तो आईला हाका मारू लागला.

किनारा पूर्ण शांत होता. त्याच्या आईचा प्रतिसाद आला नाही. प्रवासाने ते पार दमून गेलं होतं. आराम करण्यासाठी ते डोळे मिटतं.



पण किनाऱ्यावर पिल्लू सील अगदीच एकटं नव्हतं. तिथेच बाजूच्या दगडावर एक लहान मुलगा त्याच्या बाबासोबत बसला होता. पाण्यातून बाहेर पडलेलं ते हरवलेलं पिल्लू सील त्यांना दिसतं. त्यांनी त्यासाठी बोस्टन, मॅसॅच्युसेट्स मधील न्यू इंग्लंड मस्त्यालयाला फोन लावला. तिथल्या ग्रेग अर्ली नावाच्या शास्त्रज्ञाने त्यांना पिल्लू सीलवर लक्ष ठेवायला सांगितलं.

“जर चोवीस तासात त्याची आई नाही आली तर मी मेनेला येईन आणि सील पिल्लूला मस्त्यालयात घेऊन जाईन,” तो म्हणाला.

समुद्रातील सर्व सस्तन प्राण्यांप्रमाणे सील माशाच्या संरक्षणासाठीही कायदे अस्तित्वात आहेत. त्या कायद्यानुसार त्यांना मदत करण्याची परवानगी फक्त काही नोंदणीकृत लोकांना असते. ग्रेगही त्यापैकीच एक होता.

त्या रात्री सील पिल्लू खूप कमी झोपलं. जाग आली कि ते सारखं आईला आवाज द्यायचं. दिवस उजाडला तेव्हा ते खूप दमून गेलं होतं..



बोस्टनच्या दक्षिणेला दीडशे मैल लांब असलेल्या सील रेसक्यू केंद्राची सुपरवायझर कोनी ग्रेगची मदतनीस म्हणून काम करते. दोघे गाडी घेऊन मेनेला आले. त्यांनी सील पिल्लूला खोक्यात भरलं आणि गाडीत घातलं. समृद्रातील प्राण्यांना रेसक्यू करणं, ते आजारी असतील किंवा जखमी झाले असतील तर त्यांच्यावर औषधोपचार करणं, त्यांची योग्य काळजी घेणं आणि बरे झाल्यावर त्यांना परत समृद्रात सोडणं हि कामंही ते मस्त्यालयातील इतर कामांबरोबर करायचे. त्यांनी आणि मस्त्यालयातील विशेष हॉस्पिटलच्या कर्मचाऱ्यांनी अनेक समृद्री कासवे, डॉल्फिन, व्हेल आणि असंख्य सीलना मदत केली होती. ह्यामध्ये न्यू इंग्लंडच्या किनाऱ्यावर मोठ्या प्रमाणात आढळणारे हार्बर सील प्रामुख्याने असत.

एप्रिलमध्ये बेबी सीलसाठी केंद्राचा फोन सारखा खणखणत असतो. कारण वसंत ऋतूत भरपूर हार्बर सील आया बाळांना जन्म देतात. अनेक सील बाळं किनाऱ्यावर दिसतात. पण त्या सगळ्या बाळांना मदतीची गरज असतेच असं नाही. आपल्यासारखीच ती बाळंही थंडीत कुडकुडूली कि ऊब मिळण्यासाठी किनाऱ्यावर यायची. ते काही एकटे नसायचे. त्यांची आई बाजूलाच पाण्यामध्ये असायची आणि आपल्या पिल्लांवर लक्ष ठेवायची.

सील आया पिल्लांचा सांभाळ करण्यात कुशल असतात. पण वादळाचा तडाखा बसला तर मात्र उसळलेल्या लाटा आई आणि बाळाला विरुद्ध दिशेला फेकून देतात. ह्या मेनेच्या पिल्लुच्या बाबत नेमकं तेचं घडलं होतं.



काही सील आयांच्या वेगळ्या समस्या असतात. कधी कधी त्या अपुऱ्या दिवसांच्या किंवा अशक्त बाळांना जन्म देतात. माणसाच्या बाळांच्या बाबतीत असं झालं कि आपण ती पूर्ण बरी होईपर्यंत हॉस्पिटलमध्ये ठेवतो. पण निसर्गात वावरणाऱ्या सील माशांना मात्र शार्क किंवा स्पीड बोटींपासून स्वतःचा बचाव करता येईल इतकी ताकद असावीच लागते. अशक्त पिल्लांकडे पोहण्याइतकी शक्ती नसते त्यामुळे सील आईने अशा पिल्लांबरोबर राहणं म्हणजे स्वतःचा जीव धोक्यात घालणं असतं. त्यामुळे कितीही इच्छा असली तरी नाईलाजास्तव आया अशा पिल्लांना सोडून जातात.

दुपार होण्याच्या आधी ग्रेग आणि कोनी मेनेच्या किनाऱ्याला पोचले. त्यांनी सील पिल्लूसोबत अर्धा तास वाट पाहिली. त्याची आई येणार नाही ह्याची खात्री पटल्यावर त्यांनी त्याला बोस्टनला घेऊन जाण्याची तयारी सुरु केली.

कोनीने ट्रकमधून पिंजरेवजा खोका बाहेर काढला. ग्रेग सावकाश आणि काळजीपूर्वक पिल्लाजवळ गेला. पिल्लू खेळण्यासारखं छोटसं दिसत असलं तरी ते एक जंगली प्राणी होतं. त्यामुळे घाबरून ते आपल्या छोट्या पण अणुकुचीदार दातांनी चावा घेऊ शकतं हे अनुभवाने ग्रेगला पक्कं माहित होतं.



पिल्लू मिणमिणत्या डोळ्यांनी जवळ आलेल्या ग्रेगकडे पाहत होता. रात्रीपासून पोटात काहीही न गेल्यामुळे तसेच थंडीमुळे ते पार गळून गेलं होतं. पिल्लाने अजिबात पळून जायचा प्रयत्न केला नाही. ग्रेगने त्याला धरलं तेव्हा त्याने थोडंस अंग हलवलं. कोनीने खोक्याच्या पिंजऱ्याची जाळी उघडली आणि हळुवार त्याला पिंजऱ्यात ढकललं. उपाशी, गारठलेल्या आणि दमलेल्या पिल्लाने कुठलाही विरोध केला नाही.

त्या अंधारी उबदार खोक्यामध्ये ते थकलेलं पिल्लू लगेच झोपून गेलं. गाडी बोस्टनला निघाली.

पिल्लूला न्यू इंग्लंड मत्सालयात आणल्याबरोबर तिथल्या वैद्यकीय मदतनिसांनी त्याची तपासणी केली. त्यामुळे योग्य औषधोपचार लगेचच चालू करायला सोपं जातं. केंद्रातील प्राण्यांचे मुख्य डॉक्टर अँडी स्टॅंपर ह्यांनी स्टेथोस्कोपने पिल्लाचे छातीचे ठोके आणि फुप्फुसे तपासली. पिल्लाचा श्वास मंद होता. थंडीमुळे कदाचित न्यूमोनियाही झाला असावा. जंतुसंसर्ग झाला आहे का हे तपासण्यासाठी त्याचे रक्त सिरिंजने काढले.



पोटात हे जंतू राहतात. प्राणी जे खातात त्यातून ह्या जंतुनाही खाद्य मिळतं. जर थोड्या प्रमाणात जंतूसंसर्ग झाला तर निसर्गातील धडधाकट प्राणी नैसर्गिकरीत्या बरे होतात. परंतु आजारी पिल्लांच्या बाबतीत मात्र हे जंतूच सगळं पिल्लाचं खाणं खाऊन टाकतात त्यामुळे पिल्लांची तब्बेत आणखीन खालावते. ह्या सीलच्या बाळाला जर असा संसर्ग झाल्याचं आढळलं तर डॉ. अँडी त्याला लगेच औषध देऊ शकणार होते. अंगात सिरींज खुपसली तेव्हा पिल्लू जोरात विव्हळलं.

“ओऽऽऽऽह-ऑऽऽऽऽऽ-ऑऽऽऽऽऽ-ऑऽऽऽऽऽऽऽह!”

तपासणी पूर्ण झाल्यावर प्राण्याची देखभाल करणारा मदतनीस जिमने पाच नंबरचा लाल रंगाचा गोल कागदाचा बिल्ला त्याच्या डोक्यावर चिकटवला. तिथली हार्बर सीलची सगळी बाळं एकसारखीच दिसतात त्यामुळे ह्या मेने बीचवरच्या पिल्लाची ओळख पटण्यासाठी असा नंबरचा बिल्ला लावणं गरजेचं होतं. कुत्रा जसा वर्षातून आपले केस झाडतो तसच सीलचं बाळही आपले जुने केस झटकतो. तेव्हा हा बिल्ला निघून जातो पण तोपर्यंत सील बाळाने लाल रंगाची टोपी घातली आहे असं वाटतं.



इतर सील बाळांबरोबर राहायला जायच्या आधी ह्या नवीन बाळाला काही दिवस विलागीकरणात ठेवावं लागतं. त्याचा संसर्ग इतर पिल्लांना लागू नये म्हणून त्याची सर्दी बरी होईपर्यंत त्याला एकट्याला एका वेगळ्या खोलीत ठेवलं. ही खोली शांत आणि कमी उजेडाची असते. इथे आजारी पिल्लूची तब्येत सुधारते. तसेच केंद्रातला वास, आवाज आणि गडबड ह्याची सवय होते. तसेच इतर कुठल्या नवीन प्राण्याशी जुळवून घेण्याचे कष्ट त्याला आल्यावर लगेच घ्यावे लागत नाही. घरापासून लांब गेल्यावर आपण जसे घरच्या आठवणीने उदास होतो तसंच हे पिल्लूही उदास पडून होतं.

ते फार जोरात ओरडायचं म्हणून विलगीकरण कक्षात असतानाच त्याचं तिथल्या कर्मचाऱ्यानी "हावलर" असं बारसं केलं.

सर्दी बरी झाल्यावर हावलरला त्या खोलीतून बाहेर काढलं. खूप सारी पिल्लं असलेल्या एका मोठ्या पांढऱ्या खोलीत त्याला आणलं. ह्या खोलीच्या अर्ध्या भागात पोहण्याचा खोल तलाव केला होता. उरलेल्या अर्ध्या भागात वर दिवे आणि खाली आडवे ओटे बांधले होते. त्या ओट्यावर चढून दिव्याच्या उबेखाली ते झोपू शकत होते. त्या खोलीला काचेची दारे होती.



हावलर ह्या नवीन खोलीत आल्यावर दुसऱ्या बाळांनी जवळ येऊन त्याचा वास घेतला आणि लगेच आपल्या गटात त्याला सामावून घेतलं.

हावलर दिव्याखाली आराम करत होता तेव्हा एक पिल्लू रडत होते. हावलर चकित होऊन सगळीकडे पाहत होता. लिंडा आणि केविन हे दोन मदतनीस पिवळ्या रंगाचे रेनकोट घालून त्या काचेच्या दारातून आत आले. लिंडाच्या हातात टॉवेल तर केविनकडे जेवण असतं.

सगळी पिल्लं भुकेने ओरडू लागतात. मासे किंवा दुध असं अन्न घेण्याएवढे ते अजून मोठे नाहीत. आणि गाईच्या दुधात साखर असते त्यामुळे त्यांना ते पचणं शक्य नसत. चुकीचं खाणं जर पिल्लांना दिलं तर ती आणखीन आजारी पडू शकतात.

इथे पिल्लांसाठी खास जेवण बनवलं जातं. खूप प्रयोग केल्यानंतर काही वर्षांपूर्वी सील आईच्या दुधासारखं खाणं कसं बनवायचं हे त्यांनी शोधलं होतं. खऱ्या सीलच्या दुधासारखं पौष्टिक दुध बनवणं ही काही सोपी गोष्ट नाही. योग्य तो फॉर्मुला वापरून सर्वांसाठी पुरेसं पेय बनवायला त्यांना दोन दिवस लागायचे. साय, कॉटेज चीझ, वेगवेगळ्या प्रकारची तेलं आणि दुधाची भुकटी ह्या सर्वांचं योग्य मिश्रण तयार करायचं. दिसायला ते अगदी डोश्याचं पिठ वाटतं. त्याचा वासही आंबट असतो.



हावलरला भरवण्याचा आज पहिलाच दिवस होता. लिंडाने त्याला उचललं आणि टॉवेलने घट्ट गुंडाळलं. तिने त्याचं फक्त तोंड बाहेर ठेवलं होतं.

“आऽऽह-रुऽऽह! आऽऽऽऽह-रुऽऽऽऽह!,” हावलरने निषेध नोंदवला.

लिंडाने हळूच त्याचं तोंड उघडलं आणि मऊ रबरी नळी त्याच्या घशात घातली. ट्यूब व्यवस्थित बसल्यावर केविनने नळीच्या दुसऱ्या तोंडाला फनेल लावून ते पेय आत सोडलं. डोळे मिटून हावलरने आनंदाने ते पेय मटकावलं. प्रत्येक पिल्लूला आधीच्या दिवसापेक्षा थोडं जास्त पेय दिवसातून चार वेळा समान प्रमाणात मिळायचं.

काही पिल्लं माणसाच्या बाळांसारखं बाटलीने प्यायचे. पण हावलरसारख्या अनेक बाळांना अजून बाटलीने ते कसं प्यायचं हे कळत नसल्यामुळे त्यांना ट्यूबने खायला द्यावं लागायचं. ते केंद्रात दाखल व्हायचे तेव्हा इतके नाजूक असत कि बाटलीने प्यायला शिकवण्यात वेळ घालवण्यापेक्षा त्यांच्या पोटात काहीतरी जाणं हे त्यावेळी जास्त महत्वाचं असायचं.

हावलरचं खाणं झाल्यावर लिंडाने त्याचा टॉवेल सैल केला. पोट टम्म भरल्यामुळे आळसावलेला हावलर कसाबसा दिव्याखाली गेला. काही मिनिटांत तो गाढ झोपून गेला.



हावलरचा पूर्ण दिवस झोपण्यात, खाण्यात आणि पोहण्यात जायचा. तो आता अंगाने भरू लागला होता. केंद्रात आला तेव्हा त्याचं वजन फक्त सतरा पौंड होतं. आता तो पंचवीस पौंडाचा झाला होता. औषधं आणि खाणं ह्याने त्याचा वजन अजून तेरा पौडानी वाढलं. केंद्रात येऊन हावलरला तीन महिने झाले. आता त्याच्यासाठी काही नवीन सुरु करण्याची वेळ आली होती.

एके दिवशी सकाळचा नाश्ता झाल्यावर केंद्रातील बेलिंडा नावाची अजून एक मदतनीस हावलरच्या खोलीत आली आणि तिथून त्याला नव्या खोलीत घेऊन गेली. ह्या नवीन खोलीत हावलरच्या आकाराएवढे अजून काही सील होते. ह्या खोलीत उथळ आणि खोल असे दोन छोटे तलाव तयार केले होते.

दुपारी रॉबिन नावाचा मदतनीस आला. त्याने हावलरला उचललं आणि छोट्या उथळ तलावामध्ये ढकलून दिलं. हावलरच्या मिश्या थरथरल्या. त्याला तलावात कुणीतरी हालचाल करताना दिसलं. त्याने एकदा उजवीकडे पाहिलं आणि मग डावीकडे. तेवढ्यात त्याला एक छोटा मासा दिसला. हावलर त्याचा पाठलाग करू लागला. मासा छोटा आणि चपळ असल्याने त्याच्या नजरेतून निसटला. हावलरने परत एकदा डावीकडे मग उजवीकडे पाहिलं. मासा नजरेत आल्यावर पुन्हा त्याच्या मागे मागे पळू लागला.



हावलर जर आईसोबत असता तर आतापर्यंत तिने त्याला मासे कसे पकडायचे हे शिकवलं असतं. पण आता माणसे त्याने शिकार करावी म्हणून प्रयत्न करत होती. अनेक तास त्या उथळ तलावामध्ये आपल्या मिशा हलवत, इकडून तिकडून पळत माशांच्या मागे पळायचं हा हावलरचा आवडता खेळ बनून गेला होता.

मासे हे खेळण्यासाठी नाही तर खाण्यासाठी असतात हे बऱ्याच दिवसांनी एकदाचं त्याला कळलं. आता हावलरला नळीने खाणं द्यावं लागत नव्हतं. खोल तलावामध्ये डुबकी मारून केंद्रातल्या मदतनीसाने सोडलेले मासे पकडण्यात आणि खाण्यात तो तरबेज झाला होता.

आता लवकरच तो घरी परत जाणार होता.

सप्टेंबर महिन्यातील एक पावसाळी सकाळ. ग्रेग सहा वाजताच हावलर आणि अजून तीन सीलची पिल्लं झोपली होती त्या खोलीत आला. गेले पाच महिने ग्रेग हावलरची काळजी घेत होता. त्याचं वजन आता एखाद्या दणकट हार्बर सीलच्या पिल्लाएवढं म्हणजे चाळीस पौंड झालं होतं. भूक लागली कि तो शिकार करायचा. हावलर आता निसर्गात आपली आपण काळजी घ्यायला तयार झाला आहे ह्याची ग्रेगला खात्री पटली. हावलर डोक वर करून डोळे मिचकावले आणि अंग ताणून दिलं. त्याच्यासाठी हा नेहमीचा दिवस होता.



इकडे बाहेरच्या खोलीत रेनकोट आणि रबरी बूट घालून कोनी, जिम आणि बेलिंडा दोन पिंजरेवजा खोके घेऊन तयार होते. एक लाकडी निळ्या रंगाचा पिंजरा होता तर दुसरा हावलर केंद्रामध्ये ज्या पिंजऱ्यातून आला होता तसाच जाळीदार पण आकारने मोठा होता.

निळा लाकडी खोका खोलीत आणला गेला. त्याला एक विचित्र वास होता. सीलच्या पिल्लांनाही ते काय आहे हे कळत नव्हतं. दोन्ही पिल्लं छपछप आवाज करत खाली गेली आणि लांबून त्या पिंजऱ्याचं निरीक्षण करू लागली.

जिम त्या दुसऱ्या पिल्लाच्या आणि तलावाच्या मध्ये उभा राहिला. तो, ग्रेग, कोनी, बेलिंडा मिळून ते पिल्लू आता पिंजऱ्यामध्ये जावं ह्यासाठी प्रयत्न करत होते. पिल्लू आत गेल्यावर त्यांनी दार बंद केलं आणि तो पिंजरा बेलिंडा आणि ग्रेगने उचलून गाडीत ठेवला.

आता हावलरची पाळी होती. तो अजिबात घाबरला नाही. त्याच्या ह्या सर्व लोकांवर पूर्ण विश्वास होता. त्याला माहीत होतं की हे लोक आपल्याला कुठलीही इजा करणार नाही. पिंजऱ्यात एक मासा टाकला आणि हावलरला त्यांनी आत जाण्यास थोडं चुचकारलं. हावलर लगेच आत गेला. .



केंद्रातील लोकानी हावलर आणि दुसऱ्या छोट्या सीलला घेतलं. त्यांना ते शंभर किलोमीटर लांब असलेल्या केप कॉडजवळच्या निमुळत्या समुद्रात सोडण्यासाठी निघाले. पावसामुळे रस्ते निसरडे झाले होते त्यामुळे ग्रेग काळजीपूर्वक गाडी चालवत होता.

त्यांना सोडायचे होते त्या रिलीज साईटचा किनारा शांत होता. पाणी गार आणि वाहतं होतं. केंद्रातील लोक गाडीतून बाहेर आले आणि त्यांनी हावलरचा पिंजरा बाहेर काढला. हावलरला आधी पाण्यात सोडायचे असे त्यांनी ठरवले होते. प्रत्येकाने पिंजऱ्याची एकेक कडा धरली होती. ते सावकाशीने वाळूतून चालत होते.

हावलर पिंजऱ्याच्या जाळीतून बाहेर पाहत होता. त्याने तिथला वास घेतला पण तिथलं पाणी, वाळू आणि फेसाळलेलं पाणी त्याला अपरिचित वाटलं. अचानक दार उघडलं गेलं आणि तो समुद्रात ढकलला गेला.



हावलर सुरुवातीला थोडासा अडखळला. पण समुद्राची जादू जबरदस्त असते. तो लोळायला लागला. पाउस आणि थंडीचा त्याला फारसा फरक पडला नाही.

एका मोठी लाट आली आणि तो पाण्यात फेकला गेला. लाटांबरोबर स्वत:ला सांभाळत तो प्रवाहाबरोबर वर खाली होऊ लागला. त्याने आपल्या मोठ्या काळ्याभोर डोळ्याने किनाऱ्याला असलेल्या लोकांकडे पाहिलं आणि लाटांबरोबर तरंगत तो नजरेआड झाला.

ग्रेग, कोनी, बेलिंडा आणि जिम तो कुठे दिसतो का ते पाहत होते. अचानक कोनीला निळ्या लाटेवर एक करडा बिंदू दिसला.

“तो बघा तिकडे,” ती आनंदाने ओरडली.

हावलर आता खुल्या समुद्रात पोहत होता.

त्याचे घर त्याला परत मिळाले होते.